**शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील शिल्पनिदेशकांच्या नियमित करणेबाबतच्या मागणीच्या अनुषंगाने मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करणेत आलेल्या समितीमध्ये विधानपरिषद सदस्य श्री. विक्रम काळे यांचा समावेश करण्याबाबत**

महाराष्ट्र शासन

**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण- ३३१७/प्र.क्र.२१०/व्यशि-३**

दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : १७ ऑगस्ट, २०२३.

वाचा :- १) शासन निर्णय क्र. संकीर्ण-३३१७/प्र.क्र.२१०/व्यशि-३ दि. १२.०७.२०२३

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधिन शासन निर्णयान्वये शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील कंत्राटी शिल्पनिदेशक यांना नियमित करण्याच्या मागणीच्या अनुषंगाने मा. मंत्री, कौशल्य, रोजगार,उद्योजकता व नाविन्यता विभाग यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करणेबाबत शासन निर्णय दि.१२.०७.२०२३ रोजी निर्गमित करण्यात आला आहे. सदर समितीमध्ये विधानपरिषद सदस्य श्री. विक्रम काळे यांचा समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील कार्यरत कंत्राटी शिल्पनिदेशक यांच्याकडून वेळोवेळी शासन सेवेत नियमित करण्याबाबत केलेल्या मागणीच्या अनुषंगाने मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीमध्ये विधानपरिषद सदस्य श्री. विक्रम काळे यांचा समावेश करण्यात येत आहे.तद्नंतर समितीची रचना खालिलप्रमाणे करण्यात येत आहे.

| अ.क्र. | समिती सदस्य | पद |
|---|---|---|
| १ | मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग | सदस्य |
| ४ | अपर मुख्य सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ५ | प्रधान सचिव, नियोजन विभाग | सदस्य |
| ६ | श्री. विक्रम काळे, विधानपरिषद सदस्य | सदस्य |
| ७ | श्रीमती शोभाताई फडणवीस | तज्ञ सदस्य |
| ८ | सहसचिव/उपसचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग | सदस्य |
| ९ | संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई | सदस्य सचिव |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०८१७१२३६४६२३०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by ABHINANDAN NAMDEV MORE
Date: 2023.08.17 12:39:23 +05'30'

**(अभिनंदन मोरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत ,**

१. मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव , कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय,मुंबई
३. अमुस, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अमुस, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. सर्व विभागीय शिक्षण उप संचालक, (शालेय शिक्षण विभाग), (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)
८. सहसंचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय,मुंबई/नाशिक/पुणे /औरंगाबाद/ अमरावती/नागपूर (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)
९. संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, ( व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)
१०.श्री. विक्रम काळे, विधान परिषद सदस्य
११. निवड नस्ती. (व्यशि-३).